विभागीय स्तरावरील भारत निर्माण कक्ष बंद करुन त्यावरील अधिकारी/कर्मचा-यांची प्रतिनियुक्ती संपुष्टात आणणेबाबत.

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
**शासन निर्णय क्रमांकः जजमि-२०२०/प्र.क्र.१०३/पापु ०७**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई
तारीख: ३० सप्टेंबर,२०२०

वाचा:-

१. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.आस्था १००६/ प्र.क्र.४७२/पापु ०१, दि.०१.०१.२००८
२. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.ग्रापाधो-१११५/प्र.क्र.७५/पापु ०७, दि.१४.०७.२०१५
३. मुख्य अभियंता (प्रभारी), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागपूर यांचे पत्र क्र.BNU/Nagpur/७४/२०२०, दि.२१.०७.२०२०
४. मुख्य अभियंता (प्रभारी), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नाशिक यांचे पत्र क्र.MJP/CE/DWSC/Nashik/१२७/२०२०, दि.०५.०८.२०२०
५. उप अभियंता, वि.मा.पु. कक्ष, औरंगाबाद यांचे पत्र क्र.जा.क्र./मु.अ.म.जी.प्रा.औ/विपापुक/वेतन /९००/२०२०,दि.०६.०८.२०२०
६. मुख्य अभियंता(प्रभारी), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,अमरावती यांचे पत्र क्र.भानिक/अम/लेखा/११४३/२०२०, दि.०७.०८.२०२०
७. मुख्य अभियंता (प्रभारी), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे यांचे पत्र क्र.मजीप्रा/मु.अ. ठाणे/तांशा-२/५९४, दि.१०.०८.२०२०
८. मुख्य अभियंता (प्रभारी), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, पुणे यांचे पत्र क्र.भानिक/आस्था-२/३८/२०२०, दि.१०.०८.२०२०

<u>प्रस्तावना-</u>

संदर्भिय क्र.१ च्या शासन निर्णयान्वये भारत निर्माण कार्यक्रमांतर्गत ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमाची अंमलबजावणी व संनियंत्रण करण्यासाठी विभागीय आयुक्त यांच्या नियंत्रणाखाली विभागीय स्तरावर विभागीय भारत निर्माण कक्षाची स्थापन करण्यात आली. संदर्भिय क्र.२ च्या शासन निर्णयान्वये विभागीय आयुक्त

कार्यालयातील विभागीय भारत निर्माण कक्ष हा त्या त्या प्रादेशिक मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण कार्यालयात विलीन करण्यात आला. या विभागीय भारत निर्माण कक्षावर निर्माण करण्यात आलेल्या ८ विविध संवर्गावर महाराष्ट्र जीवन प्राधिकरण कार्यालयातील अधिकारी/कर्मचारी प्रतिनियुक्तीने कार्यरत आहेत.

सन २०१९ पासून केंद्र शासनाने राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाची पुनर्रचना करुन नवीन जल जीवन मिशनची सुरवात केली आहे . जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत भारत निर्माण कक्षाबाबत तरतूद नसल्याने सदर कक्ष बंद करुन त्यावरील पदांची प्रतिनियुक्ती संपुष्टात आणण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत भारत निर्माण कक्षबाबत तरतूद नसल्याने सदर कक्ष दि.३०.०९.२०२० पासून बंद करण्यात येत आहे. तसेच या कक्षावरील प्रतिनियुक्तीने कार्यरत पदांची प्रतिनियुक्ती दि.३०.०९.२०२० पासून संपुष्टात आणण्यात येत असून त्यांच्या सेवा त्यांच्या मूळ संवर्गात महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या आस्थापनेवर सुपुर्द करण्यात येत आहेत. भारत निर्माण कक्षावर प्रतिनियुक्तीने कार्यरत सर्व अधिकारी/कर्मचा-यांना दि.३०.९.२०२० मध्यान्हनंतरपासून कार्यमूक्त करण्यात येत असून त्यांनी दि.०१.१०.२०२० पासून त्यांच्या मूळ आस्थापनेवर रुजु व्हावे.

२. भारत निर्माण कक्षावर कार्यरत अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतन व भत्ते तसेच कार्यालयीन खर्चाकरीता राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत सहाय्यिकृत बाबी खाली निधी उपलब्ध करुन दिला जातो. विभागीय भारत निर्माण कक्ष, अमरावती,औरंगाबाद व नागपूर कक्षावर कार्यरत अधिकारी/ कर्मचा-यांच्या माहे-जुलै ते सप्टेंबर,२०२० या कालावधीतील वेतन व भत्ते तसेच कार्यालयीन खर्चाकरीता रु.३३,६५,८१३/- इतका निधी उपलब्ध करुन देणेबाबत संदर्भिय पत्रान्वये विनंती करण्यात आली आहे. त्याअनुषंगाने कळविण्यात येते की, विभागीय भारत निर्माण कक्ष, अमरावती,औरंगाबाद व नागपूर कार्यालयास वितरित करावयाचा रु.३३,६५,८१३/- इतका निधी संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेकडील सहाय्यिकृत बाबी या घटकाखालील राज्य हिश्यान्तर्गत उपलब्ध निधीतून त्यांचेस्तरावरुन वितरित करण्यात यावा

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९३०१२०२२१८३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VASANT BHIMRAO MANE

Digitally signed by VASANT BHIMRAO MANE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VASANT BHIMRAO MANE
Date: 2020.09.30 13:28:34 +05'30'

**वसंत माने**

अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,

भारत निर्माण कक्ष, पुणे/अमरावती/नागपूर/औरंगाबाद/कोकण/नाशिक कार्यालयात प्रतिनियुक्तीने कार्यरत सर्व संबंधित अधिकारी/कर्मचारी

प्रत,

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे वरिष्ठ स्वीय्य सहाय्यक मंत्रालय, मुंबई
४. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
५. मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई
६. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
७. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
८. अवर सचिव (पापु-२५), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
९. संचालक, पाणी व स्वच्छता सहायय् संस्था, बेलापूर, नवी मुंबई.
१०. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
११. निवडनस्ती (कार्यासन पापु ०७)